**सन २०१४-१५ मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषी विस्तार व तंत्रज्ञान अभियानाअंतर्गत कृषी यांत्रिकीकरण उपअभियान राज्यात राबविण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-१०१४/प्र.क्र.१२४/४-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ३० डिसेंबर, २०१४

वाचा

१) **शासन निर्णय क्रमांकः कृयांउ-१०१४/प्र.क्र.१२४/४-अे, दिनांक ०३ जून, २०१४**
२) **केंद्र शासनाचे उपसचिव (एम ॲण्ड टी )यांचे इंग्रजी पत्र क्र. ३-६/२०१२-M&T (I&P), दि. १० जुलै, २०१४**
३) **केंद्र शासनाने उपअभियानासंदर्भात http://farmtech.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करून दिलेल्या मार्गदर्शक सूचना**
४) **केंद्र शासनाचे अवर सचिव (एम ॲण्ड टी )यांचे इंग्रजी पत्र क्र. ३-४(१५)/२०१४-M&T (I&P), दि. ०९ जुलै, २०१४ ( तीन पत्रे )**
५) **कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. सुकृऔ/कृ.या.उ.अ./११५/२०१४-१५ गुनि-५/१४, दि. ०५ ऑगस्ट, २०१४**
६) **केंद्र शासनाचे अवर सचिव (एम ॲण्ड टी )यांचे इंग्रजी पत्र क्र. ३-४(१५)/२०१४-M&T (I&P), दि. ०८ सप्टेंबर, २०१४ ( तीन पत्रे )**
७) **कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र. कृ.या.उ.अ./११५/२०१४-१५/गुनि-५/२०१४/१५८, दि. २९ सप्टेंबर, २०१४**

प्रस्तावना

केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये सन २०१४-१५ पासून कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर अभियानांतर्गत कृषि यांत्रिकीकरण उपअभियानाचा अंतर्भाव केला आहे. सदर उपअभियानांतर्गत एकूण आठ घटक असून, घटक क्रमांक १ व २ हे यंत्राची प्रात्यक्षिके, प्रशिक्षण व तपासणी बाबत आहेत. हे दोन्ही घटक १००% केंद्र पुरस्कृत असून, उर्वरीत ६ घटकासाठी केंद्र व राज्य शासनाच्या निधीच्या हिश्याचे प्रमाण ७५:२५ टक्के असे आहे. केंद्र शासनाने सदर उपअभियानाच्या मार्गदर्शक सूचना http://farmtech.gov.in या सांकेतस्थळावर उपलब्ध करून दिलेल्या आहेत. सदर उपअभियान राज्यात राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विविध समित्यांची स्थापना करण्यात आली आहे.

केंद्र शासनाने सदर उपअभियान, राज्यात सन २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र. २ च्या पत्रान्वये ₹ २२६४.०० लाख मंजूर केले असल्याचे कळविले आहे. केंद्र शासनाने केंद्र हिश्श्यापोटी मंजूर केलेला ₹ २२६४.०० लाख निधी व त्यानुषंगाने राज्य हिश्श्याचा ₹ ७५५.०० लाख निधी, अशा एकूण ३०१९.०० लाख निधीचा कार्यक्रम राज्यात राबविण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

त्याचप्रमाणे सदर उपअभियानातील घटक क्र. ४ **"भाडेतत्वावर सेवा सुविधा पुरविण्यासाठी फार्म मशिनरी बँक स्थापना करणे "** साठी संदर्भाधीन अ.क्र.४ च्या पत्रांन्वये केंद्र हिश्श्यापोटी ₹३००.०० लाख रक्कम वितरित केली आहे. केंद्र हिश्श्यापोटी वितरित केलेली रक्कम व त्यानुषंगाने राज्य हिश्श्यापोटी आवश्यक असलेली ₹१००.०० लाख, अशा एकूण ₹ ४००.०० लाख रक्कम घटक क्र. ४ च्या अमंलबजावणीसाठी वितरित करावयाची आहे. तसेच घटक क्र. ३ **" शेतकऱ्यांना कृषी औजारे व संयंत्रे यांचा अनुदानावर पुरवठा करणे "** साठी संदर्भाधीन अ.क्र.६ च्या पत्रांन्वये केंद्र हिश्श्यापोटी ₹१७३३.७१ लाख रक्कम वितरित केली आहे. केंद्र हिश्श्यापोटी वितरित केलेली रक्कम व त्यानुषंगाने राज्य हिश्श्यापोटी आवश्यक असलेली ₹५७७.९० लाख, अशा एकूण ₹ २३११.६१ लाख रक्कम घटक क्र. ३ च्या अमंलबजावणीसाठी वितरित करावयाची आहे. अशाप्रकारे घटक क्र. ३ व ४ च्या अमंलबजावणीसाठी एकूण २७११.६१ लाख रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब देखील शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

केंद्र शासनाने बाराव्या पंचवार्षिक योजनेमध्ये सन २०१४-१५ पासून राष्ट्रीय कृषि विस्तार व तंत्रज्ञान अभियान राबविण्याचे निश्चित केले आहे. सदर अभियानांतर्गत कृषि यांत्रिकीकरण उपअभियानाचा अंतर्भाव केला असून सदर उपअभियान राज्यात सन २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र. २ च्या पत्रान्वये केंद्र हिश्श्यापोटी मंजूर करण्यात आलेला ₹ २२६४.०० लाख निधी व त्यानुषंगाने राज्य हिश्श्याचा ₹ ७५५.०० लाख निधी, अशा एकूण ₹ ३०१९.०० लाख ( अक्षरी रूपये तीस कोटी एकोणीस लाख फक्त ) निधीचा कार्यक्रम राज्यात सन २०१४-१५ मध्ये राबविण्यासाठी शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्याचप्रमाणे सदर उपअभियानाअंतर्गत घटक क्र. ३ व ४ च्या अमंलबजावणीसाठी केंद्र शासनाने केंद्र हिश्श्यापोटी वितरित केलेला ₹ २०३३.७१ लाख, व त्यानुषंगाने राज्य हिश्श्यापोटी आवश्यक असलेला ₹ ६७७.९० लाख, अशा एकूण ₹ २७११.६१ लाख ( अक्षरी रूपये

सत्तावीस कोटी अकरा लाख एकसष्ठ हजार फक्त ) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला ₹२७११.६१ लाख ( अक्षरी रूपये सत्तावीस कोटी अकरा लाख एकसष्ठ फक्त ) निधी, खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१४-१५ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

| | लेखाशिर्ष | (रूपये लाखात) |
|---|---|---|
| अ | **मागणी क्र. डी-३, २४०१- पीक संवर्धन, (००) ११३- कृषी अभियांत्रिकी केंद्र पुरस्कृत योजना (००) (०८) कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (केंद्र हिस्सा ७५ टक्के) ( २४०१ २५१३)- ३३ अर्थसहाय्य** | २०३३.७१ |
| ब | **मागणी क्र. डी-३, २४०१- पीक संवर्धन, (००) ११३- कृषी अभियांत्रिकी (००) (१६) कृषी यांत्रिकीकरण उपअभियान (राज्य हिस्सा २५ टक्के) (२४०१ ८७३६) - ३३ अर्थसहाय्य** | ६७७.९० |

३. वितरित निधी खर्च करताना केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. १० मे, २०१४ च्या पत्रान्वये मंजूर केलेल्या नियतव्ययाच्या मर्यादेत व उपअभियानाअंतर्गत संदर्भाधीन अ.क्र. ३ अन्वये वितरित केलेल्या मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जात नाही, याबाबत कृषि संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आवश्यक ती दक्षता घ्यावी.

४. सदर उपअभियान सन २०१४-१५ या वर्षामध्ये राबविण्यासाठी ₹ २७११.६१ लाख खर्चाच्या कार्यक्रमासाठी कृषि संचालक ( निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे व या निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास त्यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत होईल याची दक्षता कृषि संचालक ( निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी घ्यावी.

५. केंद्र शासनाने घटक क्र.४ च्या अमंलबजावणीसाठी वितरित केलेला ₹ ३००.०० लाख व त्यानुषंगाने आवश्यक असणारा २५ टक्के राज्य हिश्श्याचा ₹१००.०० लाख, असा एकूण ₹४००.०० लाख निधी केंद्र शासनाने सूचित केल्याप्रमाणे त्या-त्या घटकांसाठीच खर्च होईल, याची कृषी संचालक (नि.व गु.नि.), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी काटेकोरपणे दक्षता घ्यावी. केंद्र शासनाने वर्गनिहाय उपलब्ध करून दिलेला निधी खालीलप्रमाणे आहे:-

(रक्कम रूपये लाखामध्ये)

| वर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|
| अनुसूचित जाती | ४८.०० | १६.०० | ६४.०० |
| अनुसूचित जमाती | २४.०० | ८.०० | ३२.०० |
| सर्वसाधारण | २२८.०० | ७६.०० | ३०४.०० |
| एकूण | ३००.०० | १००.०० | ४००.०० |

६. केंद्र शासनाने घटक क्र.३ च्या अमंलबजावणीसाठी वितरित केलेला ₹ १७३३.७१ लाख व त्यानुषंगाने आवश्यक असणारा २५ टक्के राज्य हिश्श्याचा ₹ ५७७.९० लाख, असा एकूण ₹२३११.६१ लाख निधी केंद्र शासनाने सूचित केल्याप्रमाणे त्या-त्या घटकासाठीच खर्च होईल, याची कृषी संचालक (नि.व गु.नि.), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी काटेकोरपणे दक्षता घ्यावी. केंद्र शासनाने वर्गनिहाय उपलब्ध करून दिलेला निधी खालीलप्रमाणे आहे:-

(रक्कम रूपये लाखामध्ये)

| वर्ग | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण |
|---|---|---|---|
| अनुसूचित जाती | २७७.३९ | ९२.४६ | ३६९.८५ |
| अनुसूचित जमाती | २२५.३८ | ७५.१३ | ३००.५१ |
| सर्वसाधारण | १२३०.९४ | ४१०.३१ | १६४१.२५ |
| एकूण | १७३३.७१ | ५७७.९० | २३११.६१ |

७. सदर निधी खर्च करताना तो विहित कार्यपध्दती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे /पक्रियेचे /वित्तीय अधिकाऱ्यांच्या मर्यादेत/ P.W.D. मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार/CAG च्या निदेंशानुसार /प्रचलित शासन निर्णय /नियम/परिपत्रक/ तरतुदीनुसार, बजेट व कोषागर नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

८. कृषी यांत्रिकीकरण उपअभियानाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्टनिहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्याची दक्षता घेण्यात यावी

I) लाभार्थी निवडताना लहान व सिमांतक शेतकरी, अनुसूचित जाती/जमाती शेतकरी व महिला लाभार्थी यांना प्राधान्य देण्यात यावे.

II) अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती लाभार्थ्यांसाठी मंजूर असलेला खर्च त्याच प्रवर्गासाठी करण्यात यावा व याबाबतच्या नोंदी स्वतंत्रपणे ठेवण्यात याव्यात. तथापि, अनुसूचित जाती/ अनुसूचित जमाती यांच्यासाठी निधीचे वाटप करताना त्या- त्या जिल्ह्यात त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणात करण्यात यावे.

III) उपअभियानाची अमंलबजावणी अधिक प्रभावीपणे व परिणामकारकरित्या होण्याच्या दृष्टीने या उपअभियानाअंतर्गत प्रकल्पाधारित विकास / विस्तार कार्यक्रम राबविण्यात यावा.

IV) प्रत्येक जिल्ह्याचा विस्तार व फलोत्पादन आराखडा तयार करण्यात येत आहे. त्यामध्ये या उपअभियानाचा अंतर्भाव गरजेनुरूप ठेवण्यात यावा.

V) या उपअभियानाचे मुल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून करून घ्यावे.

९. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा आर्थिक व भौतिक प्रगतीचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याला ५ तारखेपर्यंत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल, व सदर अहवाल केद्र शासनास सादर करताना त्यामध्ये महिला शेतकरी, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती शेतकरी यांच्यासाठी निर्धारित केलेले भौतिक/आर्थिक लक्षांक व साध्य याबाबतची माहिती वेगळ्याने सादर होईल, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ ३८९/व्यय-१/२०१४, दि. ३० डिसेंबर, २०१४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व अपर मुख्य सचिव (कृषी व पणन) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२३०१५२७३८४२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madan Umesh M

Digitally signed by Madan Umesh M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Madan Umesh M
Date: 2014.12.30 15:58:39 +05'30'

**( उ. म. मदन )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२. कुलगुरू, कृषी विद्यापीठे (सर्व )
३. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,पुणे (१० प्रती)
४. जिल्हाधिकारी (सर्व)
५. सर्व सन्माननीय विधीमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
७. सर्व संचालक/ सहसंचालक, कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
८. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ दिनकरराव देसाई मार्ग, गोरेगाव (पूर्व ) मुंबई- ६५
९. विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१०.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
११.सर्व मुख्य वित्त व लेखाधिकारी (जिल्हापरिषद)
१२.सर्व कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद
१३.महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबईनागपूर/ (लेखा परिक्षा( /(लेखा व अनुज्ञेयता)
१४. महालेखाकार (स्थानिय) निकाय लेखापरिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन,१०१ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०
१५.सर्व कोषागार अधिकारी

१६.व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय कृषि व ग्रामीण विकास बँक, मुंबई
१७.व्यवस्थापकीय संचालक,भूविकास बँक , मुंबई
१८. अध्यक्ष, सर्व जिल्हा परिषदा
१९.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
२०.नियोजन विभाग (का-१४३१) /मंत्रालय, मुंबई-३२
२१.वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३ ) / मंत्रालय, मुंबई-३२
२२.ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२३.मा. राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
२४.मा. मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
२५.निवड नस्ती (कार्यासन -४अे)